(२२६)
20150423120~~2305627~~ 02504527

हरीमहू ल.पा. योजना ता.नवापूर,
जि.नंदुरबार सुधारित प्रशासकीय मान्यता
प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- लपायो २००८/११४७/(३९६/२००८) खारभूमी
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :-११/१२/२००८

पहावे :- १) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे पत्र क्रमांक मुअ/तापाविम/प्रशा-७/२६४९/सन २००८,दिनांक १७.९.२००८

प्रस्तावना :-

हरीमहू ल.पा.. योजना, ता.नवापूर, जि.नंदुरबार या योजनेस महामंडळ निर्णय क्रमांक तापाविमं/काअ/प्रवि-१/१३-९८/प्रमा-४३/९८ दिनांक २१.१२.१९९८ अन्वये रुपये **३९४.९५** लक्ष रक्कमेस मूळ प्रशासदकीय मान्यता देण्यात आली होती. योजनेसाठी आवश्यक असणा-या वनजमिन मुल्यवाढ तसेच दरसुची दरवाढ या कारणांमुळे योजनेच्या किंमतीत झालेली वाढ विचारात घेऊन कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामडळ, जळगांव यांच्याकडून रुपये १००६.२१ लक्ष किंमतीचा सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्ताव शासनास प्राप्त झाला व तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय

आता या शासन निर्णयान्वये हरीमहू ल.पा. योजना, ता.नवापूर, जि.नंदुरबार या योजनेस सन २००७-२००८ वर्षाच्या दरसुचीवर आधारित सुधारित केलेल्या प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रूपये १०,०६,२१,६१२/- (रूपये दहा कोटी, सहा लक्ष, एकवीस हजार सहाशेबारा फक्त) यापैकी कामाप्रित्यर्थ रूपये ९,४०,५६,९३२/- व रूपये ६५,६४,६८०/- अनुषंगिक खर्च या रक्कमेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. उपशिर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये देण्यात आलेला आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशिर्ष "४७०२ लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च ८००-इतर खर्च (१) बांधकामे लघु पाटबंधारे योजना पंचवार्षिक योजनांतर्गत योजना" यावर खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय क्रमांक संकिर्ण १०९९/(१२९/९९) मोप्र (प्र) दिनांक १८/५/१९९९ मधील तरतूदीनुसार आंतर वित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

शासन निर्णय क्रमांक लपायो २००८/११४७/(३९६/२००८) खारभूमी दि.११/१२/२००८ चे परिशिष्ट

हरीमहू लघु पाटबंधारे योजना, ता.नवापूर, जि.नंदूरबार अंदाजपत्रकाचा गोषवारा

| क्रमांक | शिर्ष / उपशिर्ष | रक्कम (रूपये लक्ष) | | एकूण रुपयात |
|---|---|---|---|---|
| | | शिर्षकामे | मुख्य व शाखा कालवे | |
| १ | "ए" प्राथमिक | ४५३२०० | ३०००० | ४८३२०० |
| २ | "बी" (भूसंपादने) | २८४१०१३५ | ७०५००० | २९११५१३५ |
| ३ | "सी" मुख्य कामे | २६२३९१०८ | -- | २६२३९१०८ |
| ४ | "डी" विमोचक | ३४९५७३६ | १५००००० | ४९९५७३६ |
| ५ | "ई" फॉल | -- | १७९५००० | १७९५००० |
| ६ | एफ आरएचटी वर्क्स | -- | ३५००००० | ३५००००० |
| ७ | जी पूल (सीटी क्रॉसिंग) | -- | ४५००००० | ४५००००० |
| ८ | "एच" एस्केप | --- | -- | -- |
| ९ | "के" इमारती | १५०००० | -- | १५०००० |
| १० | "एल" मातिकाम | -- | ११०००००० | ११०००००० |
| ११ | एम वृक्षरोपन | ७५००० | ४५००० | १२०००० |
| १२ | ओ संकीर्ण | ५०००० | २२५३० | ७२५३० |
| १३ | पी देखभाल | ६६२२३ | ३००००० | ३६६२२३ |
| १४ | आर दळणवळण | २००००० | -- | २००००० |
| | वितरिका | --- | ११५२०००० | ११५२०००० |
| | कामाप्रित्यर्थ किंमत | ५९१३९४०२ | ३४९१७५३० | ९४०५६९३२ |
| | अनुषांगिक खर्च (१० टक्के भूसंपादन वगळून)<br>योजनेची एकूण किंमत | | | ६५६४६८०<br>१००६२१६१२ |

**ठळक वैशिष्ट्ये**

| | |
|---|---|
| योजनेची सिंचन क्षमता | २७० हेक्टर |
| नियोजित पाणीसाठा | २३४०.६५ सघमी |
| पाणीसाठयाची प्र.स.घ.मी. किंमत (रु) NPV वगळून | ३२९६३ < ३३००१ (आर्थिक मापदंड बसते) |
| लाभव्यय गुणोत्तर NPV वगळून | १.८१ > १.०० (आर्थिक मापदंडात बसते) |